**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२००९/प्र.क्र.८३ /समन्वय कक्ष,**
**मंत्रालय, मुंबई -३२.**
**दिनांक- ४ ऑगस्ट, २००९.**

**- परिपत्रक -**

माहिती तंत्रज्ञानाचा जास्तीत जास्त वापर करुन राज्याचे प्रशासन अधिक गतीमान व कार्यक्षम करणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने गेल्या काही वर्षापासून अनेक उपक्रम राबविण्यात येत आहेत. उदा.,सेतु, व्हिडिओ कॉन्फरन्सींग,बायोमॅट्रीक उपस्थिती नोंदणी,डाक्युमेंट जर्नी मॅनेजमेंट सिस्टम इ. सचिवांना कार्यालयीन कामकाजासाठी लॅपटॉप्सही पुरविण्यात आले आहेत. मात्र, विशेषत: मंत्रालयीन पातळीवर विभागांकडून आयटी प्रणालीचा परिणामकारक वापर होत नाही, असे मा.मुख्यमंत्री यांच्या निदर्शनास आले आहे. कागद विरहीत कार्यालय (पेपरलेस ऑफीस) ही संकल्पना प्रत्यक्ष अमलात आणणे अत्यंत जरुरीचे आहे. यादृष्टीने सचिवांनी स्वत:हून पुढाकार घेणे आवश्यक असल्याचे मत मा.मुख्यमंत्र्यांनी व्यक्त केले आहे.

मंत्रालयात विविध विभागांमार्फत बैठका आयोजित करण्यात येतात. मा.मुख्यमंत्री सचिवालयात बैठका सादरीकरण व इतरही कार्यक्रम होत असतात. या बैठकांच्या सूचना व निमंत्रणे छापील स्वरुपात वितरीत करण्याची पध्दत आहे. मात्र, यापुढे ही पध्दत बंद करुन कागदपत्रांचा अनावश्यक वापर थांबविण्याचे ठरविण्यात आले आहे. यादृष्टीने यापुढे मा.मुख्यमंत्री सचिवालयात आयोजित बैठकांच्या सूचना/निमंत्रणे ही लोटस-नोटस् आणि इंट्रानेटचा वापर करुन ई-मेल द्वारे कळविण्यात येतील. दिनांक १५ जुलै,२००९ पासून ही पध्दती संपूर्णत: लागू केली जाईल. विभागाचे सचिव व अधिकारी यांनी कार्यालयातील इंट्रानेट माध्यमातून त्यांच्या ई-मेलवर आलेल्या सूचना लॅपटॉप/डेस्कटॉप संगणकावर पहाव्यात असे अपेक्षित आहे. या संदर्भात माहिती व तंत्रज्ञान विभागाद्वारे योग्य त्या सूचना देण्यात येणार आहेत.

व्हिडिओ कॉन्फरन्सींगची सुविधाही पुरेशा प्रमाणात वापरली जात नसल्याचे मा. मुख्यमंत्री कार्यालयाच्या निदर्शनास आले आहे. या यंत्रणेमुळे मंत्रालयांतून राज्यात कुठेही संबंधित अधिकाऱ्यांशी प्रत्यक्ष बोलता येणे शक्य आहे, बैठका घेणे शक्य आहे. त्यामुळे कालापव्य टळून आर्थिक भारही बऱ्याच प्रमाणात कमी होऊ शकतो. क्षेत्रीय अधिकाऱ्यांशी चर्चा करण्यासाठी मा.मुख्यमंत्री महोदयांच्या स्तरावर व्हिडिओ कॉन्फरसिंगचा वापर सुरु झाला असून, विभागातील ही यंत्रणा त्वरित उपयोगात आणावी.

मा.मुख्यमंत्री कार्यालयाला ई-मेलद्वारे नागरिकांच्या अनेक तक्रारी प्राप्त होत असतात. या तक्रारी शासनापर्यंत अधिक जलदगतीने पोहचाव्यात व त्यांना न्याय मिळावा असा यात हेतू असतो. प्रत्यक्षात या ई-मेल्सवर विभागांकडून समाधानकारक कार्यवाही होत नाही.

यापुढे मा.मुख्यमंत्री कार्यालयात येणारे ई-मेल संबंधित विभागाच्या सचिवांना विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी व विभाग प्रमुखांना लोटस् नोटस् / डिजेएमएस च्या माध्यमातून फॉर्वर्ड (अग्रेषित) करण्यात येतील. त्यावर विभागाने कार्यवाही सुरु करुन त्याची माहिती आठ दिवसांत ई-मेलद्वारे संबंधित व्यक्ती तसेच मा.मुख्यमंत्री सचिवालय जनसंपर्क कक्षाला तातडीने कळविणे आवश्यक आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून,त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९०८०४१८३६४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(र.ग.सय्यद )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) सर्व सहसचिव/उपसचिव/विशेष कार्य अधिकारी (पं.रा.),ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई -३२.

२) अवर सचिव/कक्ष अधिकारी , ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

३) अवर सचिव (जल-२३ कार्यासन), जलसंधारण उपविभाग, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

४) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व),

५) विभागीय उपायुक्त (आस्थापना/विकास), विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व),

६) मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व),

७) मा. सचिव (ग्राम विकास व पंचायत राज), /प्रधान सचिव (जलसंधारण )यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,

८) निवड नस्ती.